शासकीय विभाग/कार्यालयातील गट-अ ते गट-ड संवर्गात पदभरती करतांना संवर्ग व्यवस्थापन/ आर्थिक नियोजन व कामाचे नियोजन इ. बाबी लक्षात घेऊन पदभरती करण्याकरीता मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही २०१५/प्र.क्र. २९०/का.१२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: १६ जुलै, २०१५

वाचा -

**शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः संकीर्ण २०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५**

प्रस्तावना -

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये नवीन पदनिर्मिती तसेच पदभरती यावर निर्बंध आणल्यामुळे शासकीय विभाग/कार्यालयातील गट-अ ते गट-ड मधील पदे भरण्यावर निर्बंध आले आहेत.

२. संदर्भाधीन आदेश निघाल्याच्या दिनांका पासून नवीन पदनिर्मिती पूर्णपणे बंद राहील. मात्र हे बंधन सिडको, एम.एम.आर.डी.ए., पी.एम.आर.डी.ए., एन.आय.टी., एन.एम.आर.सी.एल., एम.एम.आर.सी.एल., पी.एम.आर.सी.एल., या सारख्या आर्थिक सक्षम स्वायत्त संस्थांना तसेच केंद्रशासन पुरस्कृत (ज्या आस्थापनांचे पगार केंद्र शासनांच्या अनुदानातून होतात.) संस्थांना लागू राहणार नाहीत.

३. शिक्षक,पोलिस कॉन्स्टेबल, ग्रामसेवक, तलाठी, आरोग्य परिचारीका, पशुधन परिवेक्षक, मत्स्यव्यवसाय विभागाचे तालुका स्तरावरील अधिकारी, वनरक्षक, कृषि सहायक, पाटबंधारे विभागाचे कनिष्ठ अभियंता या संवर्गात एकूण रिक्त पदांपैकी ७५% पर्यंत पदे भरण्यास मुभा राहील. तसेच या संवर्गाव्यतिरिक्त इतर संवर्गातील सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त असणाऱ्या पदांपैकी ५०% किंवा एकूण संवर्गाच्या ४% या पैकी जे कमी असेल इतकी पदे भरता येतील अशा सूचना संदर्भाधिन शासन निर्णयान्वये दिल्या आहेत.

४. गट-अ ते गट-ड मधील सरळसेवेची रिक्त पदे भरण्याची कार्यवाही प्रशासकीय विभाग प्रमुख यांच्याकडून करण्यात येते. संदर्भाधीन शासन निर्णयानुसार पदभरती करतांना संवर्ग व्यवस्थापन/आर्थिक नियोजन व कामाचे नियोजन इ. बाबी लक्षात घेऊन पदभरती करण्याबाबत कार्यपध्दती विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

५. गट-अ ते गट-ड मधील ज्या संवर्गात रिक्त पदांचा अनुशेष मोठ्या प्रमाणावर असून विहीत टक्केवारीपेक्षा जास्त प्रमाणात पदे भरण्याचे तातडीची गरज आहे, अशा बाबतीत रिक्त पदे भरण्यास मान्यतेचे प्रस्ताव प्रशासकीय विभागास पूर्ण समर्थनासह सादर करता येतील. असे प्रस्ताव तपासणीसाठी पुढीलप्रमाणे समिती स्थापित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, वित्त विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | संबंधित प्रशासकीय विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव | निमंत्रित सदस्य |
| ४. | सहसचिव/उपसचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य सचिव |

६. शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक.०२.०६.२०१५ अन्वये स्थापन केलेल्या अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखालील वरील समितीने प्रस्ताव तपासून पदभरती संदर्भात शिफारस केल्यास प्रशासकीय विभागाने सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेऊन त्याबाबतचे आदेश प्रथम काढणे आवश्यक राहील. त्यानंतर पदभरती बाबत उचित कार्यवाही करता येईल. तसेच,

१. दिनांक.०२.०६.२०१५ पूर्वी नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत, परंतु संबंधित उमेदवार रुजू झालेले नाहीत, अशा बाबतीत संबंधित उमेदवारांना रुजू होण्यास परवानगी देण्यात यावी.

२. निवड यादीतील खुल्या गटातील उमेदवारांना नियुक्ती देण्यात आलेली आहे. मात्र आरक्षणातील उमेदवारांच्या कागदपत्रांची पडताळणी दिनांक.०२.०६.२०१५ नंतर पूर्ण झालेली असल्याने ज्यांना नियुक्ती देण्यात आलेली नाही, अशा उमेदवारांना नियुक्ती द्यावी.

३. ज्या प्रकरणी मागणीपत्र पाठवून उमेदवारांच्या शिफारशी आयोगाकडून/ जिल्हा निवड समित्यांकडून विभागास/नियुक्ती प्राधिकाऱ्यास प्राप्त झाल्या आहेत अशा प्रकरणी देखील पदे भरण्यास मुभा राहील.

४. ज्या प्रकरणी पदभरतीसाठी पदांची मागणी निवड समित्यांना व महाराष्ट्र लोकसेवा आयोगास दिनांक ०२.०६.२०१५ पूर्वी पाठविली असेल व त्यानुषंगाने दिनांक.१६.०७.२०१५ पर्यंत जाहिरात प्रसिध्द करण्यात आली आहे, अशा जाहिरातीत नमूद करण्यात आलेली पदे भरण्यास मुभा राहील.

५. ज्या विभागांनी निवड समित्यांना व महाराष्ट्र लोकसेवा आयोगास पदभरतीबाबत दिनांक ०२.०६.२०१५ पूर्वी मागणीपत्र पाठविले असेल परंतु पाठविलेल्या मागणीपत्राच्या अनुषंगाने दिनांक १६.०७.२०१५ पर्यत जाहिरात प्रसिध्द झाली नसल्यास, त्यांनी वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक.०२.०६.२०१५ मध्ये दिलेल्या सूचनांनुसार पद मागणीबाबत पुनर्विचार करावा आणि आवश्यकतेप्रमाणे या समितीकडे प्रस्ताव सादर करावेत.

७. सर्व प्रशासकीय विभागप्रमुख व कार्यालयप्रमुख यांनी वरील आदेशांचे काटेकोरपणे पालन करुन रिक्त पदे भरण्याबाबत उचित कार्यवाही करावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१७११५२१७८३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.07.17 14:21:11 +05'30'

**( डॉ.भगवान सहाय )**

अपर मुख्य सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. सर्व मा. संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मा.मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. सर्व मंत्रालयीन विभाग,
९. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११. *प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१२.*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३.*प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई,
१४. *प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मंबई,
१५.*सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१६.*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
१७.*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
१८. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
१९. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
२०. *सचिव, राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
२१. *प्रबंधक, राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई ४०० ००१,
२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (२ प्रती प्रसिध्दीकरिता),

२३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
२५. सर्व विभागीय आयुक्त,
२६. सर्व जिल्हाधिकारी,
२७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२९.सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
३०. सामान्य प्रशासन विभाग/का. ३९ (महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्दीकरिता),
३१.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
३२.बहुजन समाज पार्टी, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.पी. भवन, प्लॉट नं. ८३-अे, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई ७४ (५ प्रती)
३३.भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१ योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई २० (५ प्रती)
३४.भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्ही.पटेल रोड, मुंबई ४ (५ प्रती)
३५.भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५ प्रती),
३६.इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती),
३७.नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई २१ (५ प्रती),
३८. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती),
३९.महाराष्ट्र नवनिर्माण सेना, कृष्णाकुंज, एम.बी.राऊत रोड, शिवाजी पार्क, दादर, मुंबई २८ (५ प्रती),
४०.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
४१.निवड नस्ती.